**सन २०१८-१९ मध्ये 'गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे ' ही योजना राबविण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण-२०१८/प्र.क्र. १२०/३-अे

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.

**दिनांक - ०४ जून, २०१८**

**संदर्भ** :

१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. कृविका-२०१७/प्र.क्र. ३२/३-अे, दि. २४ जुलै, २०१७

२) शासन पुरक पत्र, कृषि व पदुम विभाग, क्र. कृविका-२०१७/प्र.क्र. ३२/३अे, दि. १ सप्टेंबर, २०१७

३) शासन पुरक पत्र, कृषि व पदुम विभाग, क्र. कृविका-२०१७/प्र.क्र. ३२/३अे, दि. १७ ऑक्टोबर, २०१७

४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. कृविका-२०१७/प्र.क्र. ३२/३-अे, दि. २४ जुलै, २०१७

५) शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२ एप्रिल, २०१८

६) संचालक (विस्तार व प्रशिक्षण ), कृषि आयुक्तालय यांचे पत्र क्र. संचा. आत्मा/गटशेती/अनु.मा/२२४/२०१८, दि.१९.५.२०१८

**प्रस्तावना** :-

सन, २०२२ पर्यंत शेतकऱ्यांचे उत्पन्न दुप्पट करण्याच्या केंद्र शासनाच्या दृष्टीकोणास अनुसरुन पीक उत्पादन वाढविण्यासाठी निविष्ठा, प्रशिक्षण, सिंचन, यांत्रिकीकरण, काढणीपश्चात तंत्रज्ञान, कृषिमाल प्रक्रीया व पणन इत्यादी बाबी महत्वाच्या ठरतात. राज्यातील शेतकऱ्यांची जमीनधारणा कमी असल्याने शेतकऱ्यांच्या उत्पादनात भरीव वाढ होण्यासाठी सामुहिक शेती, शेती करण्याची आधुनिक पध्दती व काटेकोर नियोजनाची आवश्यकता ही बाब विचारात घेऊन 'गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे' ही योजना राबविण्यास संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. 'गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतक-यांच्या गट शेतीस चालना देणे ' ही योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्यासाठी रु. १००.०० कोटी इतकी तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली असून सदर निधीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब व वित्त विभागाच्या दि. २.४.२०१८ च्या परिपत्रकानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार मंजुर तरतुदींच्या ७०% म्हणजेच रु. ७०.०० कोटी एवढा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तदनुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ मध्ये 'गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे' ही योजना राबविण्यासाठी रु. १००.०० कोटी (अक्षरी रुपये शंभर कोटी फक्त) एवढ्या निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर योजनेची संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयामधील तरतुदींनुसार अंमलबजावणी करण्यात यावी.

२. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२ एप्रिल, २०१८ नुसार सदर योजनेसाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु. १००.०० कोटी (अक्षरी रुपये शंभर कोटी फक्त) एवढ्या तरतुदीपैकी ७०% निधी म्हणजेच रु. ७०.०० कोटी (अक्षरी रुपये सत्तर कोटी फक्त) एवढा निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च सन २०१८-१९ मध्ये योजनेकरिता मंजुर झालेल्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

मागणी क्र. डी-३

२४०१ - पीक संवर्धन,

१०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण ,

( ०१ ) माहिती व प्रचार

( ०१) (५५) गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे ( १०० % राज्य योजना)

(२४०१ अे७८२) योजनातंर्गत ( दत्तमत)

४. सदर योजनेअंतर्गत प्राप्त होणारा निधी कोषागरातून आहरित करून वितरीत करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी तसेच सहायक संचालक लेखा-१, कृषि आयुक्तालय, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत मानधनाच्या/खर्चाच्या रकमा DBT (Direct Benefit Transfer) द्वारे प्रदान करण्यात याव्यात.

५. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये गट शेती योजनेअंतर्गत शेतकरी गट/कंपनीस तांत्रिक सल्लागाराची सेवा आवश्यक असल्यास एका कृषि पदवीधारक/पदवीधारकाची तांत्रिक सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या शासन निर्णयान्वये सदर गटांना कृषि महाविद्यालयातील RAWE उपक्रमाअंतर्गत ज्या विद्यार्थ्यांना ग्रामीण भागात क्षेत्र अभ्यासासाठी निवडले जाते, त्या विद्यार्थ्यांना देखील सदर गटांचे तांत्रिक सल्लागार म्हणुन नेमणुक करणयची मुभा राहील. यासंदर्भात आयुक्त (कृषि) यांनी कृषि विद्यापीठांच्या कुलगुरूंशी चर्चा करून विद्यार्थ्यांच्या नियुक्तीबाबत कार्यपदधती निश्चीत करून घ्यावी.

६. या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ५ च्या परिपत्रकानुसार या विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०४११०४३७३८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chandrakumar Vithal Ghaytadak

Digitally signed by Chandrakumar Vithal Ghaytadak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=034948ccd1f6b6c67380c817b34a9af75fcfa679a4609321f9da27d9ab87b0d1, cn=Chandrakumar Vithal Ghaytadak
Date: 2018.06.04 12:31:05 +05'30'

(चं.वि.घायतडक)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
४. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे (५ जादा प्रतीसह)
६. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक आत्मा तथा कृषि नोडल अधिकारी, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सर्व संचालक / कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१०. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी तथा प्रकल्प संचालक (आत्मा)
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१२. सर्व उपसंचालक, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे कार्यालय
१३. महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१४. निवड नस्ती (का.३ अे)